**झोपडपट्टी पुनर्वसन योजनेंतर्गत सशुल्क पुनर्वसन सदनिकांच्या वितरणाबाबत मार्गदर्शक सूचना.**

**महाराष्ट्र शासन**

**गृहनिर्माण विभाग**

**शासन निर्णय क्र. संकीर्ण-२०२२/प्र.क्र.५४(भाग-१)/झोपसु-१**

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,

मंत्रालय, मुंबई -४०० ०३२.

दिनांक :- १४ ऑगस्ट, २०२३.

वाचा :-

१) गृहनिर्माण विभाग, शासन निर्णय, क्रमांक-झोपुधो-०८१०/प्र.क्र.९६/२०१८/झोपसु-१, दि.१६ मे, २०१८

२) गृहनिर्माण विभाग, शासन निर्णय, क्रमांक- संकीर्ण-२०२२/प्र.क्र.५४(भाग-१)/झोपसु-१, दि.२५.०५.२०२३

प्रस्तावना :-

झोपडपट्टी पुनर्वसन योजनेंतर्गत दि.०१.०१.२००० पासून दि.०१.०१.२०११ पर्यंत अस्तित्वात असलेल्या झोपडीच्या संदर्भात अशा झोपडीत प्रत्यक्ष राहणाऱ्या झोपडीधारकांचे सशुल्क पुनर्वसन करण्याचे धोरण शासनाने दि.१६ मे, २०१८ रोजीच्या शासन निर्णयान्वये स्विकारले आहे. तसेच दि.२५.०५.२०२३ रोजीच्या शासन निर्णयान्वये झोपडपट्टी पुनर्वसन योजनेंतर्गत सशुल्क पुनर्वसन सदनिकेचे शुल्क निश्चित करण्यात आले आहे. या पार्श्वभूमीवर दि.१६.०५.२०१८ रोजीच्या शासन निर्णयातील काही तरतुदींमध्ये सुधारणा करण्याची तसेच काही तरतुदींचा नव्याने समावेश करुन मार्गदर्शक सूचना निर्गमित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

१) गृहनिर्माण विभागाच्या दि.१६.०५.२०१८ रोजीच्या शासन निर्णयातील सशुल्क पुनर्वसनयोग्य झोपडी/झोपडीधारक यांच्या पात्र/अपात्रतेसंदर्भातील सर्व अटी/शर्ती तसेच शासन निर्णयासोबतची परिशिष्टे कायम राहतील.

२) सशुल्क पुनर्वसनयोग्य सदनिकेचे शुल्क सरसकट रु.२.५० लक्ष इतके निश्चित करण्यात आलेले असल्याने त्यासंदर्भात दि.२६.०५.२०१८ रोजीच्या शासन निर्णयातील मुद्दा क्र.७ अन्वये करण्यात आलेली तरतुद वगळण्यात येत आहे. तसेच कालानुरुप सशुल्क सदनिकांच्या शुल्कात सुधारणा करण्याचे अधिकार शासनास राहतील.

३) दि.१६/०५/२०१८ च्या शासन निर्णयानुसार सशुल्क पुनर्वसन हे “सर्वांसाठी घरे” या अभियानांतर्गत असल्यामुळे शासन निर्णयाचा उद्देश विचारात घेता, सशुल्क पुनर्वसन हे फक्त निवासी कारणास्तव राहील. वाणिज्यीक/औद्योगीक कारणास्तव झोपडीधारकांना सशुल्क पुनर्वसनाचा लाभ देण्यात येणार नाही.

४) दि.२५.०५.२०२३ रोजीच्या शासन निर्णयान्वये निश्चित केलेले सशुल्क पुनर्वसनयोग्य सदनिकेचे रु.२.५० लक्ष इतके शुल्क अत्यंत माफक असल्याने सदरच्या सदनिकांच्या खरेदी/विक्रीद्वारे हस्तांतरणास महाराष्ट्र झोपडपट्टी (सु.नि.व पु.) अधिनियम, १९७१ च्या कलम ३ई च्या तरतुदी लागू राहतील.

५) दि.१६/०५/२०१८ रोजीच्या शासन निर्णयातील मुद्दा क्र.१२ मध्ये झोपडपट्टी पुनर्वसन योजनेतील मोफत पुनर्वसन सदनिका मिळण्यास पात्र ठरलेला झोपडीधारक त्याचा अशा सदनिकेवरील हक्क सोडून देऊन सशुल्क पुनर्वसन सदनिकेच्या योजनेत सहभागी होऊ शकेल, असे नमूद करण्यात आले आहे. सदरची तरतूद वगळण्यात येत असून आता मोफत पुनर्वसन सदनिका मिळण्यास पात्र ठरलेला झोपडीधारक सशुल्क पुनर्वसन योजनेत सहभागी होऊ शकणार नाही.

६) झोपडपट्टी पुनर्वसन योजनेतील सशुल्क पुनर्वसन सदनिकेचे क्षेत्रफळ प्रचलित कायदे/नियमांतील तरतुदींनुसार राहील.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक २०२३०८१४१८१७२१०६०९ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

TUMBARE SUNIL BABURAO

Digitally signed by TUMBARE SUNIL BABURAO
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=HOUSING DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=6db48f86ab804a2f08a49a53d5dddd92f7dca38c78a21ad05da451e33813593c, pseudonym=5F8C97B9A647BD157380B244EF62BE228705D065, serialNumber=4E35B68528305D98FA8F8D62D295D490751E30D94B9E433CB0CC3714A0098215, cn=TUMBARE SUNIL BABURAO
Date: 2023.08.14 18:24:24 +05'30'

**( सु.बा.तुंबारे )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा.राज्यपाल यांचे सचिव, राजभवन, मुंबई.
२. मा.मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव, मुख्यमंत्री सचिवालय, मंत्रालय, मुंबई- ३२.
३. मा.उप मुख्यमंत्री (जलसंपदा,विधि व न्याय) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
४. मा.उप मुख्यमंत्री (वित्त) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
५. मा.मंत्री (गृहनिर्माण) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
६. मा.मुख्य सचिव, यांचे वरिष्ठ स्वीय सहायक, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई.
७. अपर मुख्य सचिव, गृहनिर्माण विभाग यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई.

८. आयुक्त, बृहन्मुंबई महानगरपालिका, मुंबई.
९. महानगर आयुक्त, मुंबई महानगर प्रदेश विकास प्राधिकरण, मुंबई.
१०. मुख्य कार्यकारी अधिकारी तथा विशेष कार्य अधिकारी, धारावी पुनर्वसन प्रकल्प, मुंबई.
११. उपाध्यक्ष तथा मुख्य कार्यकारी अधिकारी, महाराष्ट्र गृहनिर्माण व क्षेत्र विकास प्राधिकरण, गृहनिर्माण भवन, वांद्रे (पू.), मुंबई
१२. मुख्य कार्यकारी अधिकारी, झोपडपट्टी पुनर्वसन प्राधिकरण, प्रशासकीय इमारत, अनंत काणेकरमार्ग, वांद्रे (पूर्व) मुंबई-५१.
१३. मुख्य कार्यकारी अधिकारी, मुंबई महानगर प्रदेश झोपडपट्टी पुनर्वसन प्राधिकरण, ठाणे.
१४. मुख्य कार्यकारी अधिकारी, झोपडपट्टी पुनर्वसन प्राधिकरण, पुणे व पिंपरी चिंचवड क्षेत्र, पुणे.
१५. मुख्य कार्यकारी अधिकारी, झोपडपट्टी पुनर्वसन प्राधिकरण, नागपूर महानगरपालिका, नागपूर.
१६. निवड नस्ती/ झोपसु-१.